**जागतिक कृषि विषयक गणना योजना (Census), महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (T.R.A.) व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्यांची योजना (I.C.S.) या योजनांतर्गत मंजूर पदांवर कार्यरत अधिकारी/ कर्मचारी यांचे मे, २०२५ चे वेतन अदा करण्याकरिता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१०८/११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ मे, २०२५

वाचा -

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१६९/११-अे, दि.१९.१२.२०२३.
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०२५/प्र.क्र.६७/११-अे, दि.२८.०३.२०२५.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७.०४.२०२५
४. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१०८/११-अे, दि.१५.०४.२०२५.
५. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१०८/११-अे, दि.०५.०५.२०२५.
६. उपआयुक्त (कृषि गणना), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.कृआ/जागतिक कृषि गणना/ २५-२६/प्र.क्र.१/१०३४३/२०२५, दि.०७.०५.२०२५
७. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. कृआ/सां.५/प्र.क्र.१०११/TRA/२५-२६/ R-६९, दि.०७.०५.२०२५

प्रस्तावना -

जागतिक कृषि विषयक गणना योजना (Census), महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (T.R.A.) , कृषि गणना आणि पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्यांची योजना (I.C.S.) योजना या तीन १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत मंजूर पदांवर कार्यरत अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतनासाठी होणारा खर्च हा प्रस्तुत योजनां अंतर्गत केंद्र शासनाकडून PFMS प्रणालीद्वारे आयुक्त (कृषि) यांना प्राप्त होणा-या अनुदानातून समायोजनाने राज्य शासनाच्या लेखाशिर्षाखाली जमा करण्याच्या अटीस अधीन राहून प्रस्तुत योजनांच्या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या निधीमधून खर्च करण्यास संदर्भ क्रं. (१) अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

जागतिक कृषि गणना योजना, महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना व पिकांचे आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना या योजनांमधील अस्थायी पदे (सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त असलेली पदे वगळून) सन २०२५-२६ मध्ये दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीकरिता चालू ठेवण्यास संदर्भ क्रं. (२) अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

वित्त विभाग, शासन परिपत्रक संदर्भ क्रं. (३) अन्वये "शासनाव्दारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS व्दारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पध्दतीने वितरीत करण्यात येऊ नये" असे नमूद केले आहे. तसेच, सन २०२५-२६ च्या प्रतिमाह वेतनाकरिता अर्थसंकल्पित निधीच्या ९ % च्या मर्यादेत निधी उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुसार संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये मार्च महिन्याचा, संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये एप्रिल महिन्याच्या वेतनाचा निधी वितरीत करण्यात आला आहे.

कृषि आयुक्तालय, पुणे कार्यालयाच्या संदर्भ क्रं. (६) व (७) च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून जागतिक कृषि विषयक गणना योजना (Census), महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (T.R.A.) व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्यांची योजना (I.C.S.) या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत, सर्व विभागीय कृषि सहसंचालक व आयुक्तालय स्तरावरील अधिकारी / कर्मचारी यांच्या, मे महिन्याच्या वेतनाकरिता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०२५-२६ मध्ये, जागतिक कृषि विषयक गणना योजना (Census), महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (T.R.A.) व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना (I.C.S.) या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत सर्व विभागीय कृषि सहसंचालक व आयुक्तालय स्तरावरील अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतनाकरिता, जागतिक कृषि विषयक गणना योजना (Census) ०१-वेतन या बाबीखाली रु.८.५० लाख, महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याच्या योजनेंतर्गत (T.R.A.) ०१-वेतन या बाबीखाली रु.५७.०० लाख व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याच्या योजनेंतर्गत (I.C.S.) ०१-वेतन या बाबीखाली रु.१७.०० लाख इतका निधी मे, २०२५ च्या वेतनाकरिता वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०२५-२६ मध्ये, जागतिक कृषि विषयक गणना योजना (Census), महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (T.R.A.) व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्यांची योजना (I.C.S.) या योजनांतर्गत अधिकारी/कर्मचारी यांच्या मे, २०२५ च्या वेतनाचा खर्च पुढील लेखाशीर्षाखालील सन २०२५-२६ करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा :-

| अ.क्र. | योजनेचे नाव | लेखाशिर्ष | उद्दिष्ट | निधी वितरण |
|---|---|---|---|---|
| १ | (००)(१०) जागतिक कृषि विषयक गणना योजना (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (कार्यक्रम) (Census) | २४०१ ०९९६ | ०१-वेतन | रु.८.५० लाख |
| २ | (००)(०९) कृषिविषयक आकडेवारीचा वेळेवर अहवाल देणे (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (कार्यक्रम) (T.R.A.) | २४०१ २५६९ | ०१-वेतन | रु.५७.०० लाख |
| ३ | (००)(११) पिकांच्या आकडेवारीत सुधारणा (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (कार्यक्रम) (I.C.S.) | २४०१ २५७८ | ०१-वेतन | रु.१७.०० लाख |

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी शासन निर्णय दि.१९.१२.२०२३ मधील तरतूदी आणि शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय/परिपत्रके यांच्या अधीन राहून खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ, आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून व आयुक्तालय स्तरावरील खर्चासाठी सहाय्यक संचालक, लेखा-१, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, विभागीय कृषि सहसंचालक स्तरावर विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने संदर्भ क्र.(३) च्या परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५२३१७१७४१२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRATIBHA
MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2025.05.23 17:18:49 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
३. उपआयुक्त (कृषि गणना), कृषि आयुक्तालय, पुणे
४. कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
५. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
६. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
७. सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
८. महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
९. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११. वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१२. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३. उपसचिव(२-अे),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
१४. कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१५. कक्ष अधिकारी (१५-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१६. निवड नस्ती, का.११-अे.